**मौजे सुनेगाव (सायाळा) (ता.गंगाखेड, जि. परभणी) या नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पापुयो - २०१७/प्र.क्र. १२१ /पापु १८**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२
तारीख: २१ ऑगस्ट, २०१७

<u>वाचा -</u>

१) ग्रामपंचायत सुनेगाव (सायाळा), ता.गंगाखेड, जि.परभणी यांचे मुळ अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यतेचा ठराव क्र. १५, दिनांक १५/०८/२०१२.
२) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, परभणी यांचे मुळ तांत्रिक मान्यता आदेश क्र.१४, दिनांक २६/०२/२०१३.
३) ग्रामपंचायत सुनेगाव (सायाळा), ता.गंगाखेड, जि.परभणी यांचे सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यतेचा ठराव क्र. ०६, दिनांक २५/१०/२०१६.
४) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, परभणी यांचे सुधारीत तांत्रिक मान्यता आदेश क्र.१३, दि. ०९/११/२०१६.
५) शासन निर्णय क्र. ग्रापाधो-१११/प्र.क्र.१३४/पापु-०७, दि. २०/०२/२०१५.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी यांचे क्र.ग्रापापुवि/जिपप/कावी /तांशा/३७७७/२०१७, दिनांक २८/०७/२०१७.

**<u>प्रस्तावना</u> :-**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे सुनगाव (सायाळा) (ता.गंगाखेड, जि. परभणी) नळ पाणी पुरवठा योजनेस ग्राम पंचायत, सुनेगाव (सायाळा), ता.गंगाखेड, जि.परभणी यांनी संदर्भ क्र.१ येथील आदेशान्वये मुळ प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. सदर योजनेच्या **रु.४१,१९,१२०/-(ढोबळ)** किमतीच्या अंदाजपत्रकास कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, परभणी यांनी संदर्भीय क्र.२ अन्वये मुळ तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. ग्रामपंचायत, सुनेगाव (सायाळा) यांनी संदर्भ क्र. ३ च्या पत्रान्वये सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. तथापी सदर योजनेच्या कामातील बदलामुळे किंमतीत वाढ झाली असल्याने कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, परभणी यांनी संदर्भ क्र.४ अन्वये प्रस्तुत योजनेच्या **रु.४७,१३,९७२/-(ढोबळ)** किंमतीच्या प्रस्तावास सुधारीत तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. परिणामी, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भाधिन पत्र क्र.**६** अन्वये शासनास सादर केला होता.

तद्नुषंगाने प्रस्तुत योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

मौजे सुनेगाव (सायाळा) (ता.गंगाखेड, जि. परभणी ) या नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.४७,१३,९७२/-(ढोबळ) (अक्षरी रुपये सत्तेचाळीस लक्ष तेरा हजार नऊशे बहात्तर फक्त)** एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

<u>अटी</u>

१. उपरोक्त नमुद सुधारित किंमतीत उर्वरित सर्व कामे ३ महिन्यात पूर्ण करावीत.
२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.
३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद, परभणी यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी व कंत्राटदार यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.
४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.
५. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हंस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.
६. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखाभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये

आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांची राहील.

७. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८. संदर्भ क्र. ५ येथील शासन निर्णयातील निर्देशानुसार त्रयस्थ तांत्रिक परिक्षणाची कार्यवाही करण्यात यावी.

९. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुर्नसुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

२. या योजनेच्या सुधारित किंमतीतील वाढीव खर्च **रु. ५,९४,८५२/- (अक्षरी रुपये पाच लक्ष चौऱ्याण्णव हजार आठशे बावन फक्त)** हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमा खालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून /किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.

३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दि. १७/०४/२०१५ च्या क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८०४११२४३२१२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh D. Ambekar

Digitally signed by Suresh D. Ambekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=296e3c880fd1b089cf7bc9aed875e1bd95a2e8ed913596c74f7aa9e24917bc3c, cn=Suresh D. Ambekar
Date: 2017.08.21 14:11:43 +05'30'

**( सु.दे.आंबेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई.
२) मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
५) जिल्हाधिकारी, परभणी.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी.

७) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
८) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
९) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
१०) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नांदेड/लातुर
११) संचालक(वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
१२) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, औरंगाबाद.
१३) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, परभणी.
१४) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१५) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१६) कार्यासने (पापु-०४, ०६,०७,०९,१०,१३,१७ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय, मुंबई-३२.
१७) निवडनस्ती कार्यासन पापु-१८.